उन्हाळ्यात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी क्षेत्रात तातडीच्या पाणी पुरवठा योजना .

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः - टंचाई -२०९९/प्र.क्र.१४/पापु-१४
मंत्रालय मुंबई - ४०० ०३२, दिनांक २ फेब्रुवारी,१९९९.

संदर्भ

१. शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांक टंचाई १०९३ /३१२/ प्र.क्र.१८/९३/नवि.२२ दिनांक १५ एप्रिल १९९३
२. शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांक १०९५/प्र.क्र.५९/नवि.२९ दिनांक २६ ऑक्टोबर १९९५
३. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक - टंचाई - १०९६/७९१/प्र.क्र.१२४/९६/पापु-१८ दिनांक ३० मे. १९९६.
४. शासन परिपत्रक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक टंचाई २०९७/प्र.क्र. १९९/पापु-१४ दिनांक २३ मे १९९७
५. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक टंचाई - २०९७/प्र.क्र.११०/पापु-१४ दिनांक ११ मार्च १९९८.

प्रस्तावना -

राज्यातील नागरी क्षेत्रात उन्हाळ्यात निर्माण होणाऱ्या पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ तातडीच्या पाणी पुरवठा योजना घेण्यासंदर्भात संदर्भ क्रमांक १ ते ५ येथील शासन निर्णय/परिपत्रक वेळोवेळी निर्गमित करण्यात आले होते. वरील सर्व आदेशाचे एकत्रित विचार करुन सर्वसमावेशक आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

वर प्रस्तावनेत स्पष्ट केल्यानुसार संदर्भात नमूद केलेले विविध आदेश अधिक्रमित करुन शासन आता खालीलप्रमाणे एकत्रित आदेश निर्गमित करीत आहे.

२ उन्हाळ्यामध्ये काही नागरी क्षेत्रात पिण्याच्या पाण्याची टंचाई भासते या कारणाने, उपलब्ध पाण्यामध्ये वाढ करण्याचे दृष्टीने काही तातडीच्या पाणी पुरवठा योजना हाती घेणे आवश्यक ठरते. तातडीच्या पाणी पुरवठा योजनेंतर्गत सर्वसाधारणपणे खालील उपाययोजना घेण्यात याव्यात.

अ) विंधण विहिरी / नलिकाकूप घेणे

ब) उच्च क्षमतेच्या विंधण विहीर / नलिकाकूप वर विद्युतपंप बसविणे,
छोटीशी पाईपलाईन टाकण्याची टाकी इत्यादी

क) ज्या ठिकाणी अन्य कोणताही पर्यायी उद्‌भव उपलब्ध नाही अशा ठिकाणी नदीचे
काठावर, नदीचे पात्रात, तलावाचे खालील बाजूस किंवा तलावात खुली विहीर
घेण्यास हरकत नाही. परंतु या खुल्या विहिरीचे ठिकाण नदी नाला किंवा
तलावापासून लांब असता कामा नये. हे ठिकाण नदी, नाला किंवा तलावापासुन
२०० ते २५० मीटरच्या आत असले पाहिजे. याबाबत भूजल सर्वेक्षण व विकास
यंत्रणेकडून पाणी उपलब्धतेचे प्रमाणपत्र प्राप्त करावे तसेच विहिरीचे बांधकाम
पावसाळ्यापूर्वी पूर्ण करुन त्यात गाळ जाणार नाही अशी व्यवस्था करण्यांत यावी.
अशा विहिरींच्या कामांना अत्यंत अपवादात्मक परिस्थितीत संबधित
विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी यांनी मंजूरी द्यावी.

ड) खालील बाबी वगळून शहराच्या पाणी पुरवठ्यात वाढ करण्यास उपयुक्त
ठरणारी इतर कामे

१. अस्तित्वात असलेल्या पाणी पुरवठा योजनांच्या दुरुस्तीची कामे.
२. उद्‌भवरील साठवण टाक्या.
३. वितरण व्यवस्था.
४. मुख्य योजनांशी संलग्न नसलेल्या योजना.
५. स्टँड बाय पंपिंग मशिनरी.
६. नव्या योजनेशी संलग्न पाईपलाईन्स.

३. तातडीच्या पाणी पुरवठा योजनांसाठी महानगरपालिका, "अ" व "ब" वर्ग नगरपालिका यांनी १० टक्के लोकवर्गणीची रक्कम भरणे आवश्यक आहे. "क" वर्ग नगरपालिका क्षेत्रात या योजनांसाठी लोकवर्गणी लागू होणार नाही. ज्या विविध नागरी क्षेत्रामध्ये तातडीच्या पाणी पुरवठा योजना हाती घेणे आवश्यक आहे असे आढळून येईल त्या क्षेत्रात तातडीच्या पाणी पुरवठा योजना पुढील अटी / शर्ती व निकषांच्या अधिन राहून मंजूर करण्यांत याव्यात.

अ) ज्या नागरी क्षेत्रामध्ये नियमित मिळणा-या पाणी पुरवठ्यापेक्षा ५० टक्के किंवा
त्यापेक्षा कमी पाणी पुरवठा उपलब्ध आहे अथवा ज्या ठिकाणी दरडोई दरदिवशी
५० लिटर एवढाच पाणी पुरवठा प्रत्यक्षामध्ये होत आहे, यापैकी जे कमी
असेल अशा क्षेत्रामध्ये तातडीची पाणी पुरवठा योजना मंजूर करण्याचा विचार व्हावा.

ब) मंजूर केलेली तातडीची पाणी पुरवठा योजना त्यावर्षी ३० जून पर्यंत पूर्ण
होणे आवश्यक आहे. ज्या योजना ३० जून नंतर चालू रहतील अशा योजनांना
नियमित पाणी पुरवठा योजनांचा आर्थिक आकृतीबंध लागू राहील

क) तातडीच्या पाणी पुरवठा योजना हाती घेण्याचे दृष्टीने पुढीलप्रमाणे आर्थिक मर्यादा
पाळण्यात याव्यात

(रु. लाखात)

| नागरी क्षेत्राचा वर्ग | आर्थिक मर्यादा |
|---|---|
| "क" वर्ग नगरपरिषद | ०६.०० |
| "ब" वर्ग नगरपरिषद | १०.०० |
| "अ" वर्ग नगरपरिषद | २०.०० |
| महानगरपालिका | २५.०० |

ड) वरीलप्रमाणे आर्थिक मर्यादा विचारात घेऊन करावयाची उपाययोजना निश्चित करण्यात यावी.

इ) तातडीच्या पाणी पुरवठा योजनाचे नकाशे व अंदाजपत्रके महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून तयार करुन घेण्यात यावेत. मात्र योजनेची अंमलबजावणी संबंधित नगरपालिका / महानगरपालीकेनी करावी.

फ) तातडीची पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मान्यता, तातडीने देण्याचे दृष्टीने विभागीय आयुक्त यांना रुपये १० लक्ष ( रुपये दहा लक्ष ) व जिल्हाधिकारी यांना रुपये ५ लक्ष ( रुपये पाच लक्ष ) पर्यंतचे प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार दिनांक १० जून पर्यंतचे देण्यांत येते आहेत, मात्र तातडीची योजना त्या वर्षीच्या उन्हाळयासाठी लाभदायक ठरणे आवश्यक राहील.

ग) तातडीच्या पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मान्यता व शासकीय अनुदान देत असतांना, जिल्हाधिकाऱ्यांना उपलब्ध करुन दिलेल्या निधी एवढाच निधी त्यांनी विचारात घेऊन योजना निश्चित करावी.

ह) संबंधित महानगरपालिका / नगरपालिकांनी प्रस्तावित योजनांना आवश्यक असेल तेथे १० टक्के लोकवर्गणी देण्याबाबतचा ठराव करणे आवश्यक आहे.

ई) योजना पूर्ण झाल्यावर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र नगरपालिका / महानगरपालिका / भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा यांनी दिनांक ३१ जलै पर्यंत जिल्हाधिकारी यांच्याकडे आणि जिल्हाधिकारी यांनी दिनांक ३१ ऑगष्ट पर्यंत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास सादर करावे.

ज) कुपनलीका व विंधन विहिरींची कामे भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेमार्फत घेण्यात यावीत. तथापी उन्हाळयात वाढलेल्या मागणीमुळे भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणेकडील विंधण यंत्रे तातडीने उपलब्ध होण्याची शक्यता नसल्यास नगरपालिका / महानगरपालिका यांना खाजगी विंधणयंत्रे वापरुन खालील अटींच्या अधिन राहून कामे करुन घेता येतील

१ प्रथमतः विंधण यंत्रे भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेकडून तातडीने उपलब्ध होणार नाहीत याबद्दल खात्री करुन घेण्यात यावी.

२ विंधण विहिरींची स्थलनिश्चिती भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेकडूनच करण्यात यावी.

३ खाजगी विंधण यंत्रांना द्यावयाचे दर भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेमार्फत निश्चित करण्यात आलेल्या दरांपेक्षा जास्त असू नयेत.

४ खाजगी विंधण यंत्रामार्फत घेण्यात आलेल्या विंधण विहिरींची भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेमार्फत तपासणी करण्यात यावी व कामे योग्य दर्जाची असल्याचे प्रमाणपत्र भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेकडून घेणे बंधनकारक राहील.

४. या प्रयोजनासाठी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना आहरण, संवितरण व नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. शासनाने वेळोवेळी नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली रक्कम काढण्यासाठी संबंधित जिल्हा कोषागाराकडे देयके सादर करावी व अनुदानाचे वितरण संबंधित नगरपालिका / महानगरपालिकांना करावे. तथापि, अनुदानाचे वितरण पुढील अटीस अधीन राहून करावे.

अ) मागील वर्षाच्या तातडीच्या पाणी पुरवठा योजनांसाठी जो निधी वितरीत केला होता त्याचा पूर्णतः वापर झाला आहे असे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित नगरपालिका / महानगरपालिकांकडून घेण्यात यावे.

ब) हा निधी पूर्णपणे वापरला नसेल तर नवीन योजनेसाठी निधी वितरीत करण्यापूर्वी तो निधी संपूर्णतः तातडीच्या पाणी पुरवठा योजनेसाठीच खर्च होईल याची खात्री करुन घेण्यात यावी.

क) या शासन निर्णयाच्या अनुषंगाने वितरीत केलेल्या निधीत योजनांवर पुनर्विनियोजन करण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांचे राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(क.न.देशमुख)
उप सचिव, महाराष्ट्र शासन